हायब्रीड व बासमती भात विकास कार्यक्रम
ही केंद्र पुरस्कृत योजना सन २००१-२००२ मध्ये
राबविण्याबाबत

महाराष्ट्र शासन
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांक- राईस १६०१/सीआर-५६/४अे
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक ११ मे, २००१

वाचा - १) केंद्र शासनाचे पत्र क्रमांक- १२-२/क २- के-पॉलिसी/एमएमII, दि.३/४/२००१
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.राईस-१६२०/सीआर २१४/४अे,
दिनांक १३/२/२००१
३)शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र.अंदाज /२००१ /प्र.क्र.८१/२५अे,
दिनांक १०/५/२००१

प्रस्तावना -

राज्याची भात पिकाची उत्पादकता देशाच्या उत्पादकतेच्या तुलनेत कमी आहे. ती वाढविण्याकरिता केंद्र पुरस्कृत व राज्य पुरस्कृत योजना राज्यात राबविल्या जात आहेत. तथापि प्रचलित योजनामध्ये संकरित व बासमती वाणांच्या बियाणाचा प्रसार व बिजोत्पादन करण्यासाठी भरीव अनुदान नव्हते. संकरित व बासमती भाताचे बिजोत्पादन खर्चीक असल्याने तसेच राज्यात बासमती भातासाठी पोषक वातावरण असूनही बियाणे महाग असल्यामुळे सर्व साधारण शेतकरी बासमती तांदळाची लागवड करु शकत नाही त्यासाठी संकरित व बासमती भाताचे क्षेत्र वाढविण्यासाठी शेतक-यांना प्रोत्साहन देण्यासाठी अनुदानावर बियाणे उपलब्ध करुन देण्यासाठीच्या या नव्या योजनेचा केंद्र शासनास सादर करण्यात आलेल्या वर्कप्लॅनमध्ये अंतर्भाव करण्यात आलेला होता. हा कार्यक्रम सन २०००-२००१ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन दिनांक१३/२/२००१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सदरहू योजना सन २००१-२००२ मध्ये राबविण्यासाठी शासन मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

शासन निर्णय :-

केंद्र शासनाचे पत्र क्र- १२-२/२ के पॉलिसी-एमएम II, कृषि मंत्रालय नवी दिल्ली, दिनांक ३/४/२००१ मधील मार्गदर्शक सूचनेनुसार तसेच दि. ८ मे, २००१ रोजी झालेल्या राज्यस्तरीय समितीच्या बेठकीत घेतलेल्या निर्णयानुसार रुपये ४४.०० लाखाचा (रुपये चौव्वेचाळीस लाख ) केंद्र पुररस्कृत हायब्रीड व बासमती भात विकास कार्यक्रम राज्यात राबविण्यांस शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.या कार्यक्रमामध्ये ७५ टक्के केंद्र हिस्सा रुपये ३३.०० लाख (रुपये तेहतीस लाख फक्त ) व २५ टक्के राज्य हिस्सा रुपये ११.०० लाख आहे (रुपये अकरा लाख फक्त ). सदर कार्यक्रम राबविण्यासाठी शासन रुपये ४४.०० लाखाचा (रुपये चौव्वेचाळीस लाख )निधी मुक्त करण्यास मान्यता देत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिस्सा ७५: २५ राहील.

२. सदरहू कार्यक्रमांतर्गत संकरित भात व बासमती भात बीजोत्पादन व वितरण या दोन्ही बाबीकरिता एकत्रित रुपये ७,५००/- प्रति क्विंटल अनुदान वितरणानंतर देण्यात यावे. बियाणे अनुदानास पात्र संस्था पुढीलप्रमाणे राहातील.

१) महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला
२) राष्ट्रीय बीज निगम, पुणे
३) महाराष्ट्र राज्य सहकारी तेलबिया उत्पादक महासंघ मर्यादित ( महाफेड), धुळे
४) राज्यातील कृषि विद्यापीठे

GR-20020122182325000-0400

सदरहू संस्थाना आयुक्तालय स्तरावरुन अनुदान वितरण करण्यात यावे व त्याबाबत शासनास त्वरित विवरणपत्र सादर करावे.योजनेच्या प्रगतीबाबतचा प्रतिमाह अहवाल दर महिन्यास १० तारखेपर्यंत शासनास सादर करावा.

३. राज्य शासनाच्या हिश्श्याचा व केंद्र शासनाच्या हिस्साच्या खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००१-२००२ या वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३

२४०१ पिक संवर्धन, १०२ अन्नधान्य पिके

१०२ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना/राज्य योजनांतर्गत योजना

राज्य हिस्सा (अकरा) संकरीत व बासमती तांदूळ उत्पादन कार्यक्रम (राज्य हिस्सा) ( २४०१ ३९४.१ )

केंद्र हिस्सा (दहा) संकरित व बासमती तांदूळ उत्पादन कार्यक्रम

(योजनांतर्गत/ दत्तमत) ( २४०१ ३९३.२)

४. या कार्यक्रमासाठी मंजूर करण्यात आलेला निधी खर्च करण्यास आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे व त्यांना या योजनेअंतर्गत आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

५. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे हे कार्यक्रमासाठी सन २००१-२००२ मध्ये होणारा खर्च केंद्र शासनाकडून प्रत्यक्ष प्राप्त झालेला निधी आणि मंजूर अंतिम आर्थिक तरतूदीच्या व प्रत्यक्ष वितरीत निधीच्या मर्यादेत ठेवून केंद्र शासनाच्या प्रशासकीय मान्यतेपर्यंत राबवतील.

६. उपरोक्त योजना राबविण्यासाठी आवश्यक जिल्हानिहाय भौतिक व आर्थिक लक्षांक आयुक्त (कृषि) यांनी निर्धारित करावेत. योजना राबविण्यासाठी आवश्यक त्या सर्वंकष मार्गदर्शक व तांत्रिक सूचना आयुक्त (कृषि) यांनी निर्गमित कराव्यात.

७. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. केपुयो १०९७/सीआर ७३/२५अे, दि. २१ फेब्रुवारी, १९९७ अन्वये केंद्र पुरस्कृत योजनांसाठी राज्य पातळीवर सल्लागार/अंमलबजावणी समितीची स्थापना केली आहे. या समितीमध्ये आदिवासी विकास विभाग, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या प्रतिनिधींचा समावेश असून या समितीला केंद्र पुरस्कृत योजनांना प्रशासकीय मान्यता व आर्थिक मंजूरी देण्याचे अधिकार प्रदान केलेले आहेत. हा शासन निर्णय सदर राज्यस्तरीय सल्लागार व अंमलबजावणी समितीच्या दि. ८/५/२००१ रोजी झालेल्या बैठकीत निर्णयानुसार तसेच नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५२५/व्यय-१, दि.११/५/२००१ व क्रमांक ३९७/अर्थोपाय, दिनांक ११/५२००१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यांत येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( रेखा भिडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

प्रति,

आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( ५ जादा प्रतींसह)
संचालक (विस्तार)/(नि. व गु.नि.) कृषि आयुक्तालय, पुणे
सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे-५
कृषि सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
सर्व कुलगुरु, कृषि विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य
सर्व विभागीय आयुक्त
सर्व विभागीय कृषि सहसंचालक(विस्तार)
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद

GR - GR-200201 2212325 0000-04000